**ठाणे व पालघर जिल्हयाकरीता ठाणे हे संयुक्त जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय घोषित करण्याबाबत तसेच जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, ठाणे यांना जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय, ठाणे व पालघर या कार्यालयांसाठी "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी", म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सैकवि-२०१४/(प्र.क्र.३४२/१४)/२८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख : ०९ डिसेंबर, २०१४

वाचा :-

१) **महसूल व वन विभाग, अधिसूचना क्रमांक-प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दिनांक १७/६/२०१४.**

२) **संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१२००४/सैकवि-२/३६४७, दिनांक ७/९/२०१४.**

प्रस्तावना :-

महसूल व वन विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १७/६/२०१४ च्या अधिसुचने अन्वये ठाणे जिल्हयांचे विभाजन करुन दिनांक ०१/०८/२०१४ पासून पालघर, वसई, डहाणू, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा, आणि विक्रमगड, या आठ तालुक्यांचा समावेश असलेल्या पालघर जिल्हयांची निर्मिती करण्यात आली आहे.पालघर जिल्हयातील या आठ तालुक्यांसह पुर्वी संपुर्ण ठाणे जिल्हयातील आजी/माजी सैनिक, युध्द विधवा, त्यांचे कुटूंबिय, अवंलबित यांच्या कल्याण विषयक व पुर्नवसन विषयक कामे पार पाडण्यासाठी ठाणे जिल्हयांकरिता स्वंतत्र जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय, ठाणे येथे स्थापन करण्यात आलेले आहे. पंरतु आता दिनांक १७/०६/२०१४ च्या अधिसुचनेअन्वये ठाणे जिल्ह्याचे विभाजन होऊन स्वतंत्र पालघर जिल्हयांची निर्मिती करण्यात आल्यामुळे पालघर जिल्ह्यातील आजी/माजी सैनिक, युध्द विधवा, त्यांचे कुटूंबिय,अवंलबित यांच्या कल्याण व पुर्नवसन विषयक कामे पार पाडण्यासाठी पालघर जिल्हयाकरिता आवश्यक अधिकारी/कर्मचारीवृदांच्या पदांच्या निर्मितीसह स्वतंत्र जिल्हा सैनिक कल्याण कार्यालयाची मागणी संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्या दिनांक ०७/०९/२०१४ च्या पत्रान्वये शासनास केली आहे. उक्त पार्श्वभूमीवर शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

पालघर जिल्ह्यातील आजी/माजी सैनिक, युध्द विधवा त्यांचे कुटुंबिय/अवंलबित यांच्यासाठी कल्याणकारी योजना व पुर्नवसन विषयक कामे पार पाडण्याकरिता स्वतंत्र जिल्हा सैनिक कल्याण कार्यालयाची निर्मिती व आवश्यक नविन पदनिर्मिती यासाठी लागणारा कालावधी लक्षात घेता, सद्य:स्थितीत जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय, ठाणे या कार्यालयाकडून पालघर जिल्हयातील आजी/माजी सैनिक, युध्द विधवा, त्यांचे कुटूंबिय/अवंलबित यांच्याशी निगडीत कल्याणकारी योजना व पुर्नवसन विषयक कामे राबवण्यात यावीत.

या निर्णयाच्या अनुषंगाने ठाणे जिल्हा सैनिक कल्याण कार्यालयासाठी जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी गट “अ”, पदावर नियुक्त असलेल्या अधिकाऱ्यास, ठाणे व पालघर जिल्हा सैनिक कल्याण कार्यालयांचे सर्व कार्यालयीन कामकाज तसेच सर्व प्रकारच्या देयकांवर स्वाक्षरी करण्यासाठी, या आदेशान्वये "कार्यालय प्रमुख" तसेच "आहरण व संवितरण अधिकारी", म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ भाग पहिला, उप विभाग एक मधील अनुक्रमांक ३ मधील नियम क्रमांक दोन अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०९१५१४३०५२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Pandurang Musale

Digitally signed by Sanjay Pandurang Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Pandurang Musale
Date: 2014.12.09 15:23:49 +05'30'

**(सं.पां. मुसळे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र राज्य

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२नागपूर,
३. महालेखापाल, (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
४. महालेखापाल, (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
५. सर्व विभागीय आयुक्त,

६. संचालक, सैनिक कल्याण विभाग, राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर, सोलापूर रस्ता, घोरपडी, पुणे-४०० ००१,

७. जिल्हाधिकारी, ठाणे,

८. जिल्हाधिकारी, पालघर,

९. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पालघर

१०.लेखाधिकारी (संगणक), संचालनालय, लेखा व कोषागारे, मुंबई,

११.सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय,

१२.वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई-४०००३२,

१३.सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन -२५, मंत्रालय, मुंबई,

१४. सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन -१९, मंत्रालय, मुंबई,

१५.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

१६. निवड नस्ती (२ प्रती).